वाशिम व सिंधुदुर्ग येथे नवीन एन.सी.सी. बटालियन स्थापना करण्याकरिता नवीन पदांना मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एनसीसी २०११/प्र.क्र.४६/११/क्रीयुसे ३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २७ ऑक्टोबर, २०१६.

**वाचा :-**

१. **वित्त विभागाचे पत्र क्र.पदनि २०१६/प्र.क्र.२०/१६/विसु १, दि.२९.०६.२०१६ चे कार्यवृत्त.**
२. **उपसंचालक यांचे पत्र क्र. रा.छा.से/आस्थाप/२०१०-११/(३०)का-५/२५३७ दि.०५/०८/२०१६**

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने वाशिम व सिंधुदुर्ग येथे राष्ट्रीय छात्रसेनेचे पथक निर्माण करण्यास परवानगी दिलेली आहे. त्यानुसार राष्ट्रीय छात्रसेनेचे कार्यालय नव्याने निर्माण करण्यास राज्य शासनाची तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. राष्ट्रीय छात्र सेनेमधील गट अ व गट ब गटातील अधिकारी हे सर्व रक्षा मंत्रालयाद्वारे नियुक्त केले जातात. तर गट क व गट ड या वर्गातील कर्मचारी हे राज्य शासनामार्फत नियुक्त केले जातात. गट क व ड मधील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते राज्य शासनामार्फत अदा करण्यात येतात. शासन निर्णय दिनांक २०/०९/२०११ व दि. १५/१०/२०११ अन्वये राज्यातील राष्ट्रीय छात्र सेनेअंतर्गत एकूण १००६ पदांचा आकृतीबंध मंजूर केलेला आहे. नवीन पद निर्मिती, पदांचे पुनरूज्जीवन व पदांचा आढावा इत्यादी प्रस्तावाबाबत सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय समितीच्या दि. २० जून, २०१६ रोजी झालेल्या बैठकीत राष्ट्रीय छात्र सेनेच्या वाशिम व सिंधुदुर्ग येथील युनिटसाठी प्रत्येकी १० पदांना मान्यता दिलेली आहे. त्यानुसार एकूण २० नव्याने पद निर्मितीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**:

राष्ट्रीय छात्रसेनेच्या वाशिम व सिंधुदुर्ग येथे स्थापन होणाऱ्या नवीन बटालियनसाठी गट-क व ड संवर्गातील २० पदांसाठी उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने पद निर्मिती करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार प्रत्येक एनसीसी बटालियन करिता पुढील प्रमाणे २० पदे निर्माण करण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | |
|---|---|---|---|
| | | वाशिम | सिंधुदुर्ग |
| १ | लेखा लिपिक | १ | १ |
| २ | वरिष्ठ लिपिक | १ | १ |
| ३ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| ४ | लष्कर | १ | १ |
| | एकूण | ५ | ५ |

या व्यतिरिक्त वाशिम व सिंधुदुर्ग जिल्हयात प्रत्येकी २ वाहन चालक, १ शिपाई, १ चौकीदार व १ सफाईगार अशी एकूण १० पदांची कामे बाहययंत्रणेकडून करुन घेण्यास पुढील अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) मान्य झालेल्या नवीन पदनिर्मितीच्या प्रस्तावाबाबतच्या खर्चा संदर्भात पूरक मागणीचा प्रस्ताव, व्यय अग्रक्रम समिती व वित्त विभागाच्या मान्यतेसाठी शासनास सादर करावा.

२) ज्या पदांची कामे बाह्य यंत्रणेव्दारे करुन घेण्यास मान्यता दिली आहे त्या पदांची कामे बाहय यंत्रणेव्दारे करुन घेताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २.०२.२०१३, २.१२.२०१३ व शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१६ प्र.क्र.८९ /अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६ मधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करावे.

३) विभागाच्या मंजूर आकृतीबंधानुसार अस्तित्वात असलेल्या संवर्गामध्ये नवीन पद निर्मिती केल्यास त्या पदांना मंजूर आकृतीबंधाप्रमाणे त्या त्या संवर्गाची वेतनश्रेणी लागू राहील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४६/विसु १, दिनांक १.०९.२०१३ अन्वये व उच्चस्तरीय समितीने दि. २०.६.२०१६ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२७१६५३५११९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2016.10.27 16:58:37 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. मा.मंत्री, शा.शि.व क्री.वि. यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, शा.शि.व क्री.वि.यांचे स्वीय सहाय्यक.
४. उप महासंचालक, एनसीसी महाराष्ट्र, धोबीतलाव, मुंबई ४०० ०२०.
५. सर्व उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सर्व ग्रुप कमांडर, एनसीसी गट मुख्यालय.
११. सचिव, संरक्षण मंत्रालय, केंद्र शासन, नवी दिल्ली (पत्राने)
१२. महासंचालक, एनसीसी, वेस्ट ब्लॉक क्र.४, आर के पूरम, नवी दिल्ली (पत्राने)
१३. वित्त विभाग, (वित्तीय सुधारणा), (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१४. कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प, शा.शि.व क्री.वि.,मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती